उच्च व्यावसायिक व इयत्ता बारावीनंतर सर्व अभ्यासक्रमांमध्ये शिक्षण घेणाऱ्या राज्यातील अल्पसंख्याक विद्यार्थ्यांना शिष्यवृत्ती योजना सन २०१९-२० साठी निधी वितरित करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्यांक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : अविवि-२०१९/४१४/प्र.क्र.९४/का-६**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : ११ फेब्रुवारी, २०२०

वाचा -

१. अल्पसंख्याक विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक : अविवि-२०११/प्र.क्र.४४/११/का-६, दिनांक १४ ऑक्टोबर, २०११
२. शासन निर्णय क्रमांक अल्पसंख्याक विकास विभाग क्रमांक : अविवि-२०१८/९१२/प्र.क्र.२२६/का-६, दिनांक १० ऑक्टोबर, २०१८.
३. शासन निर्णय क्रमांक अल्पसंख्याक विकास विभाग क्रमांक : अविवि-२०१८/९१२/प्र.क्र.२२६/का-६, दिनांक ३० मार्च, २०१९.
४. शासन पूरकपत्र अल्पसंख्याक विकास विभाग क्रमांक. अविवि-२०१९/प्र.क्र.१४/का-७, दिनांक ०९ एप्रिल, २०१९.
५. शासन निर्णय क्रमांक अल्पसंख्याक विकास विभाग क्रमांक. अविवि-२०१९/४१४/प्र.क्र.९४/का-६, दिनांक ०८ मे, २०१९.
६. शासन निर्णय क्रमांक अल्पसंख्याक विकास विभाग क्रंमाक. अविवि-२०१९/४१४/प्र. क्र. ९४/का-६, दिनांक २२ ऑगस्ट २०१९.
७. तंत्र शिक्षण संचालनालय, मुंबई या कार्यालयाचे का. क्र. शा. पत्र / (एस. जी. एस) / २०१९ / २९, दिनांक २३/०१/२०२० चे पत्र.
८. संचालनालय, वैधकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई या कार्यालयाचे संवैशिवसं / अविवि / २०१९-२० / शिष्यवृती / महाडीबीटी / अनुदान / १-अ, दिनांक २३/०१/२०२० चे पत्र.
९. संचालनालय, उच्च शिक्षण, पुणे या कार्यालयाचे दिनांक ३०/०१/२०२० चे विवरणपत्र.
१०. तंत्र शिक्षण संचालनालय, मुंबई या कार्यालयाचे का. क्र. १८/तंशिस / अल्प. वि. /उ.प्र. /२०२० /३८ दिनांक ३१/०१/२०२० चे पत्र.

**प्रस्तावना :-**

राज्यातील अल्पसंख्याक समाजातील उच्च व्यावसायिक शिक्षण घेणाऱ्या व इयत्ता बारावीनंतर सर्व अभ्यासक्रमांमध्ये शिक्षण घेत असलेल्या आर्थिक दृष्ट्या कमकुवत व गुणवत्ताधारक विद्यार्थ्यांकरीता शिष्यवृत्ती योजनेची अंमलबजावणी दिनांक १४/१०/२०११ च्या शासन निर्णयानुसार करण्यात येत आहे.

२. संदर्भ क्रमांक ५ व ६ येथील शासन निर्णयान्वये सदर योजनेंतर्गत योजनेचे नोडल अधिकारी संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरीता अनुक्रमे रु. ४० कोटी आणि रुपये ३०,००,९८,९२८/- असे एकूण रु. ७०,००,९८,९२८/- ( अक्षरी रुपये सत्तर कोटी अठ्ठ्याण्णव हजार नऊशे अठ्ठावीस फक्त) इतका निधी अल्पसंख्याक विद्यार्थ्यांना शिष्यवृत्ती वाटपाकरीता सन २०१९-२० या आर्थिक वर्षाकरीता मंजूर तरतूदीतून उपलब्ध करुन देण्यात आला. त्यापैकी रुपये ६६,४६,९६,९१८/- (अक्षरी रुपये सहासष्ट कोटी, सेहचाळीस लाख, शहाण्णव हजार नऊशे अठरा फक्त) इतक्या रकमेचे उपयोगिता प्रमाणपत्र उक्त दिनांक ३१ जानेवारी २०२० च्या पत्रान्वये शासनास सादर करण्यात आले आहे. पुढील उपयोगिता प्रमाणपत्रही सादर करण्याच्या सूचना देण्यात आल्या

आहेत. आता तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या दिनांक २३ जानेवारी, २०२० रोजीच्या पत्रान्वये रुपये ५१,६६,०८,३३४/- (अक्षरी रुपये एकावन्न कोटी सहासष्ट लाख, आठ हजार तीनशे चौतीस फक्त), संचालक वैधकीय शिक्षण आणि संशोधन यांनी दिनांक २३ जानेवारी २०२० च्या पत्रान्वये रूपये १२,१८,००,९००/- (अक्षरी रूपये बारा कोटी अठरा लाख नऊशे फक्त) आणि उच्च शिक्षण संचालनालय पुणे यांनी दिनांक ३० जानेवारी २०२० च्या विवरणपत्रान्वये रू २८,५९,५१७/- (अक्षरी रूपये अठ्ठावीस लाख, एकोणसाठ हजार, पाचशे सत्तरा फक्त) इतका निधी सन २०१९-२० या आर्थिक वर्षाकरीताच्या शिष्यवृती वाटपासाठी मंजूर अनुदानातून उपलब्ध करुन देण्याची विनंती केली आहे. त्यास अनुसरुन पुढीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

शासन पूरकपत्र अल्पसंख्याक विकास विभाग क्रमांक. अविवि २०१९ / प्र.क्र.१४ / का-७,- दिनांक ०९ एप्रिल २०१९ अन्वये सन २०१९-२० या आर्थिक वर्षात अनिवार्य कार्यक्रमावरील खर्चाचा अर्थसंकल्पीत निधी, अर्थसंकल्पीय अंदाज वितरण आणि संनियंत्रण प्रणालीवर (बीम्स) मंत्रालयीन विभागांना वितरीत करण्यात आलेला आहे. वस्तुत: “उच्च व्यावसायिक शिक्षण व बारावीनंतर सर्व अभ्यासक्रमांमध्ये शिक्षण घेणाऱ्या अल्पसंख्याक विद्यार्थ्यांकरिता शिष्यवृत्ती योजना”, यासाठी सहायक अनुदान (२२३५ ए ३३८)” या लेखाशीर्षाखाली रु.१२०.०० कोटी ( अक्षरी रुपये एकशे वीस कोटी फक्त) इतकी मूळ अर्थसंकल्पीय तरतूद मंजूर आहे. त्यापैकी एप्रिल ते डिसेंबर, या कालावधीच्या खर्चासाठी ६०% रक्कम म्हणून रु. ७२.०० कोटी (अक्षरी रुपये बाहत्तर कोटी) इतकी तरतूद उपलब्ध करुन देण्यात आली होती. सदर रुपये ७२.०० कोटी पैकी सन २०१८-१९ च्या शिष्यवृत्तीसाठी रुपये . ७०,००,९८,९२८/- (अक्षरी रूपये सत्तर कोटी अठ्ठयाणव लाख नऊशे अठ्ठावीस फक्त) वितरीत करण्यात आले आहेत. त्यामुळे उक्त रू ७२.०० कोटी मधून रुपये १,९९,०१,०७२/- (अक्षरी एक कोटी नव्याण्णव लाख एक हजार बाहत्तर फक्त) एवढी रक्कम शिल्लक आहे. त्यानंतर शासनाने मंजूर करून दिलेल्या रू ३० कोटी इतक्या रक्कमेच्या पूरवणी मागणीद्वारे प्राप्त झालेला निधी वित्त विभागाने उपलब्ध करून दिला आहे. त्यामुळे आता एकूण रू १५० कोटी रक्कम मंजूर असून त्यापैकी एकूण रूपये ४९,९९,०१,०७२/- (अक्षरी रूपये एकोणपन्नास कोटी नव्याण्णव लाख एक हजार बाहत्तर फक्त) इतकी रक्कम वित्त विभागाने अर्थसंकल्प वितरण प्रणालीद्वारे वितरणासाठी उपलब्ध करून दिली आहे. तंत्रशिक्षण संचालनालयाने त्यांच्या दिनांक २३ जानेवारी २०२० च्या पत्रान्वये सद्य:स्थितीत एकूण २०,७६३ आणि वैधकीय शिक्षण आणि संशोधन संचालनालय यांनी त्यांच्या दिनांक २३ जानेवारी २०२० च्या पत्रान्वये अंदाजित एकूण ४४०१ अर्ज प्राप्त होतील आणि उच्च शिक्षण संचालनालयास एकूण १,०३६ इतके अर्ज मंजूर झाल्याचे कळविले आहे. त्यानुसार उक्त संचालनालयांस अनुक्रमे रूपये ५१,६६,०८,३३४/- (अक्षरी रूपये एकावन्न कोटी सहासष्ठ लाख आठ हजार तीनशे चौतीस फक्त), रूपये १२,१८,००,९००/- (रूपये बारा कोटी अठरा लाख नऊशे फक्त) रू २८,५९,५१७/- (अक्षरी आठ्ठवीस लाख एकोणसाठ हजार पाचशे सतरा फक्त) असे एकूण रूपये ६४,१२,६८,७५१/- (अक्षरी रूपये चौसष्ठ कोटी बारा लाख अडूसष्ठ हजार सातशे एकावन्न फक्त) इतकी रक्कम आवश्यक आहे. मात्र अर्थसंकल्प वितरण आणि संवितरण प्रणालीवर सद्य:स्थितीत रू ४९, ९९,०१,०७२ (अक्षरी रूपये एकोणपन्नास कोटी, नव्याण्णव लाख, एक हजार बाहत्तर फक्त) उपलब्ध असल्याने संचालक तंत्रशिक्षण यांना रूपये ३७,५२,४०,६५५/- ( अक्षरी रूपये सदतीस कोटी बाहवन लाख चाळीस हजार सहाशे पचावन्न फक्त) संचालक वैधकीय शिक्षण व संशोधन यांना रूपये १२,१८,००,९००/ (अक्षरी रूपये बारा कोटी अठरा लाख नऊशे फक्त) आणि उच्च शिक्षण संचालनालय, पुणे यांना रूपये २८,५९,५१७/- (अक्षरी रूपये आठ्ठावीस लाख एकोणसाठ हजार पाचशे सतरा फक्त) इतकी रक्कम याद्वारे वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सन २०१९-२० या वर्षातील शिष्यवृत्तीसाठी पात्र ठरलेल्या अल्पसंख्याक समुदायातील विद्यार्थ्यांना शिष्यवृत्ती मंजूर करण्यासाठी सदर रक्कम सबंधित संचालनालयाच्या स्वाधीन करण्यात येत असून, याकरीता संबंधीत समन्वय

अधिकारी हे आहरण व संवितरण अधिकारी आणि त्यांचे संचालक हे नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील. सदर शिष्यवृत्ती वाटप त्वरीत करावयाचे असल्यामुळे या निधीचे मासिक खर्च विवरणपत्र देण्याचा प्रश्न उद्भवत नाही.

३. उक्त तीनही संचालनालयांनी, सन २०१९-२० या वित्तीय वर्षाकरीता मंजूर केलेल्या निधीच्या मर्यादेपर्यंतच खर्च करावा.

४. तसेच सन २०१८-१९ साठीच्या शिष्यवृतीसाठी वितरीत करण्यात आलेल्या निधीमधून काही रक्कम शिल्लक असल्यास आणि आवश्यक असल्यास सन २०१८-१९ मधील शिष्यवृतीसाठी तो वापरण्यात यावा अन्यथा या वर्षीच्या म्हणजेच सन २०१९-२० मधील शिष्यवृतीसाठी तो निधी वापरण्यास याद्वारे अनुमती देण्यात येत आहे. उपरोल्लेखित लेखानुदानाच्या खर्चाचा तपशील व उपयोगिता प्रमाणपत्र शासनास विहित कालावधीत सादर करावे. तसेच हे अनुदान खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्पीय नियमपुस्तिका व वित्तीय अधिकार नियम पुस्तिकेमध्ये उल्लेख केलेल्या तसेच वेळोवेळी शासनाने या अनुषंगाने दिलेले सर्व निर्देश / नियम / शासन निर्णय / आदेश आणि केंद्रिय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचना आणि नियंत्रक व महालेखापरिक्षक यांच्या निरीक्षणाचे पालन करण्यात यावे. सदर शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-१ वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक विअप्र २०१३ / प्र.क्र.३० / २०१३ / विनियम, भाग-२ दि.१५ एप्रिल,२०१५, अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त झालेल्या अधिकारांतर्गत / विभागास वेळोवेळी वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-२ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार तसेच अप्पर मुख्य सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग यांनी प्रशासनिक विभाग प्रमुख या नात्याने दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१९ / प्र.क्र.४४ / अर्थ-३, दि.०१/०४/२०१९ मधील अटींची व शर्तीची पूर्तता होत असून, सदर शासन निर्णय अल्पसंख्याक विकास विभाग शासन पूरकपत्र क्रमांक - अविवि २०१९ / प्र.क्र.१४ / का-७, दि. ०९/०४/२०१९ आणि वित्त विभाग अनौपचारीक संदर्भ क्रमांक ३०९२ / २०१९ / व्यय-१, दिनांक २ जानेवारी २०२०, वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१९ / प्र.क्र.४४ / अर्थ-३, दिनांक २२ जानेवारी २०२० अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर प्रयोजनासाठी होणारा खर्च “मागणी क्र.झेड ई-१, मुख्य लेखाशिर्ष २२३५,सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २०० इतर कार्यक्रम, राज्य योजनांतर्गत योजना (०१) (२०) उच्च शिक्षण घेणाऱ्या अल्पसंख्याक विद्यार्थ्यांकरिता शिष्यवृत्ती योजनेकरिता सहाय्यक अनुदान (कार्यक्रम) (२२३५-ए-३३८) ३४ शिष्यवृत्त्या / विद्यावेतने” या लेखाशीर्षाखाली सन २०१९-२० या वर्षाकरिता मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००२१०१६३२५८०२१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sandesh Chhabu Tadvi

Digitally signed by Sandesh Chhabu Tadvi
DN: CN = Sandesh Chhabu Tadvi, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Minorities Development Department
Date: 2020.02.11 11:24:35 +05'30'

**(सं. छ. तडवी)**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपालांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
३. मा. मंत्री/ मा. राज्यमंत्री अल्पसंख्याक विकास यांचे खाजगी सचिव
४. सर्व मा. मंत्री / मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
५. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा / विधानपरिषद,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.

६. मा. विधानसभा / विधानपरिषद सदस्य, महाराष्ट्र विधापमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
७. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
८. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. अपर मुख्य सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. प्रधान सचिव, वित्त विभाग,मंत्रालय, मुंबई.
११. प्रधान सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्य विभाग, जी.टी. रुग्णालय, नवीन मंत्रालय, मुंबई
१२. सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
१३. महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर.
१४. महालेखापाल १/२ (लेखापरीक्षा), मुंबई / नागपूर.
१५. अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई.
१६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१७. संचालक, (उच्च शिक्षण), उच्च शिक्षण संचालनालय, पुणे
१८. संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, मुंबई
१९. संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन संचालनालय, मुंबई
२०. सह सचिव / उप सचिव / अवर सचिव / कक्ष अधिकारी, अल्पसंख्यांक विकास विभाग,मंत्रालय,मुंबई.
२१. अवर सचिव (अर्थसंकल्प शाखा), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
२२. निवडनस्ती.